पोम  प्रो.मो. पो.उ.नि (मु) ५-२०११

पोलीस उपनिरीक्षक मुख्य परीक्षा - २०११

2011

**A**

परीक्षा दि. १८/०८/२०११

पेपर-१

Code : **RAM**

प्रश्नपुस्तिका क्रमांक
BOOKLET No. 121217

**प्रश्नपुस्तिका**
**मराठी व इंग्रजी**

वेळ : 2 (दोन) तास

एकूण प्रश्न : 200

एकूण गुण : 200

# सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 200 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | केंद्राची संकेताक्षरे | | | | | | | शेवटचा अंक |

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

**SEAL**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरुद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. 'तळहातावरील फोडाप्रमाणे जपणे' म्हणजे ___________
   (1) काळजी घेणे  (2) फोडाला जपणे
   (3) चिंताग्रस्त होणे  (4) चिंतातुर होणे

2. 'गणेश' हा शब्द कोणत्या संधीचे उदाहरण आहे ?
   (1) स्वरसंधी  (2) व्यंजनसंधी
   (3) विसर्गसंधी  (4) विशेषसंधी

3. खालील वाक्यात कोणत्या प्रकारच्या सर्वनामाचा वापर केला आहे ?
   आम्ही समजलो, तुमच्या मनात काय आहे ते.
   (1) दर्शक सर्वनाम  (2) पुरुषवाचक सर्वनाम
   (3) संबंधी सर्वनाम  (4) प्रश्नार्थक सर्वनाम

4. खालील म्हणीच्या अर्थासाठी अचूक पर्याय निवडा.
   'तोफेच्या तोंडी देणे'
   (1) तोंड काळे करणे  (2) संकटात लोटणे
   (3) तोंड फिरवणे  (4) त्रास देणे

5. 'हात हलवत परत येणे' या वाक्प्रचाराच्या विरुद्धार्थी वाक्प्रचार ओळखा.
   (1) हात चोळीत येणे  (2) हातपाय गाळणे
   (3) काम तडीस नेणे  (4) रिकामा येणे

6. खालीलपैकी 'देशी' शब्द ओळखा.
   (1) पीठ  (2) अण्णा  (3) बटाटा  (4) खाना

7. खालील शब्द हा कोणत्या संधीचे उदाहरण आहे ?
   शरत्काल
   (1) विसर्गसंधी  (2) व्यंजनसंधी  (3) स्वरसंधी  (4) हलसंधी

8. शब्द सिद्ध होण्याच्या क्रियेला _______________ म्हणतात.
   (1) शब्दसिद्धी  (2) प्रत्ययघटित
   (3) उपसर्गघटित  (4) अनुकरणवाचक

9. खालीलपैकी कोणता शब्द क्रियापद नाही ?
   (1) पेरणे  (2) उपरणे  (3) वेचणे  (4) उपणणे

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

10. खालीलपैकी कोणते विधान योग्य आहे ?
(1) प्रा. काळे चांगले तर्कशास्त्र शिकवित होते.
(2) चांगले तर्कशास्त्र प्रा. काळे शिकवित होते.
(3) प्रा. काळे तर्कशास्त्र चांगले शिकवित होते.
(4) तर्कशास्त्र चांगले प्रा. काळे शिकवित होते.

11. 'थेंबे थेंबे तळे साचे' या म्हणीतून कोणत्या गोष्टीचे महत्त्व सुचवले आहे ?
(1) पाणी (2) परिश्रम (3) बचत (4) पैसे

12. चांगला मुलगा परीक्षेत पास होतो. या वाक्यातील विशेषणाचा प्रकार ओळखा.
(1) अधिविशेषण (2) विधिविशेषण
(3) सार्वनामिक विशेषण (4) उत्तर विशेषण

13. 'प्रगती' या शब्दाचा विरुद्धार्थी शब्द ओळखा.
(1) अधोगती (2) अवनती (3) उन्नती (4) सन्मती

14. 'स्वत: मेल्यावाचून स्वर्ग दिसत नाही.' या म्हणीचा अर्थ
(1) स्वर्गात जाण्यासाठी स्वत: मरणे आवश्यक.
(2) अनुभवाशिवाय शहाणपण येत नाही.
(3) मरण पावल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही.
(4) मेल्याशिवाय अनुभव अशक्यच.

15. 'पंकज' या शब्दाचा योग्य अर्थ सांगा.
(1) चिखलात पडलेला. (2) चिखलाने माखलेला.
(3) चिखलात जन्मलेला. (4) चिखलाशी संबंध नसलेला.

16. शुद्ध शब्द ओळखा.
(1) निलिमा (2) निलीमा (3) नीलीमा (4) नीलिमा

17. खालील वाक्यांचे संयुक्त वाक्यात रूपांतर करा.
अ) साखरेची टंचाई आहे.
आ) भाववाढ करावी लागते.
(1) साखरेची टंचाई भाववाढीला कारणीभूत आहे.
(2) साखरेची टंचाई आहे म्हणून भाववाढ करावी लागते.
(3) भाववाढीचे कारण साखर टंचाई आहे.
(4) साखर टंचाईच्या काळात भाववाढ करावी लागते.

18. 'आजी दृष्ट काढते.' वाक्यातील प्रयोग ओळखा.
(1) कर्मणी प्रयोग (2) कर्तरी प्रयोग (3) भावे प्रयोग (4) शक्यकर्मणी प्रयोग

19. एखाद्या शब्दासाठी असलेला पर्याय दाखविण्यासाठी दोघांच्या मध्ये वापरल्या जाणाऱ्या चिन्हास म्हणतात.
(1) संयोग चिन्ह (2) अवतरण चिन्ह (3) लोप चिन्ह (4) विकल्प चिन्ह

20. खालील वाक्यातील उभयान्वयी अव्यय कोणते ?
तो गैरहजर राहिला यास्तव त्याची निवड झाली नाही.
(1) यास्तव (2) राहिला (3) त्याची (4) झाली नाही

21. गाळलेला शब्द भरा.
'अव्ययालाच ______________ म्हणतात'.
(1) विकारी शब्द (2) पद (3) अविकारी शब्द (4) विकृती

22. 'उगीचच्याउगीच' 'खालच्याखाली' हे शब्द अभ्यस्त शब्दांच्या कोणत्या प्रकारातील आहेत ?
(1) अंशाभ्यस्त
(2) अनुकरणवाचक
(3) पूर्णाभ्यस्त
(4) अर्धअभ्यस्त

23. खालीलपैकी कोणता शब्द शुद्ध आहे ?
(1) गूणवैशिष्ट्ये (2) गुणवैसिष्ट्ये (3) गुणवैशिष्ट्ये (4) गुणविशिष्टे

24. खालील वाक्यातील शब्दयोगी अव्यय शोधा.
'उन्हाच्यावेळी त्या झाडाखाली गुरेढोरे उभी राहतात'.
(1) उन्हाच्यावेळी (2) त्या (3) गुरेढोरे (4) झाडाखाली

25. 'संस्कृत भाषेतून मराठी भाषेत आलेले व त्याच स्वरूपात राहिलेले शब्द म्हणजे ______________ होय'.
गाळलेल्या जागी योग्य शब्द भरा.
(1) तत्सम शब्द (2) तद्भव शब्द (3) देश्य शब्द (4) परकीय शब्द

26. वाक्यातील कालवाचक क्रियाविशेषण शोधा.
'सदा सर्वदा योग तुझा घडावा.'
(1) योग (2) तुझा (3) सदासर्वदा (4) घडावा

27. 'सूर्य बराच वर आला आहे, पण तो ढगांनी व्यापला आहे.' या वाक्याचा प्रकार ओळखा.
(1) मिश्र वाक्य (2) संयुक्त वाक्य (3) केवल वाक्य (4) स्वार्थी वाक्य

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

28. 'स्वल्प' या शब्दाचा विग्रह ओळखा.

(1) सु + अल्प
(2) स + उ + अल्प
(3) स्व: + अल्प
(4) सव: + अल्प

29. बोलणाऱ्याच्या तोंडचे शब्द तशाच स्वरूपात दर्शविण्यासाठी कोणते विरामचिन्ह वापरले जाते ?

(1) उद्गारवाचक चिन्ह
(2) संयोग चिन्ह
(3) प्रश्नचिन्ह
(4) अवतरण चिन्ह

30. 'गृह' 'हस्त' 'शीर्ष' हे शब्द कोणत्या प्रकारातील आहेत ?

(1) तत्सम (2) तद्भव (3) फारसी (4) अरबी

31. खालील वाक्यातील क्रियापदाचा प्रकार ओळखा.

'श्रीशांत क्रिकेट खेळतो.'

(1) सकर्मक क्रियापद
(2) अकर्मक क्रियापद
(3) साधित क्रियापद
(4) संयुक्त क्रियापद

32. खालील शब्दाचे अनेकवचनी रूप कोणते ?

युवती

(1) युवत्या (2) युवती (3) व्युत्या (4) यापैकी कोणतेच नाही

33. 'बाराराशी' या विशेषणाचा प्रकार सांगा.

(1) गुणवाचक विशेषण
(2) संख्यावाचक विशेषण
(3) संख्यावृत्तीवाचक विशेषण
(4) क्रमवाचक विशेषण

34. 'जो ; जी ; जे' ही कोणत्या प्रकारची सर्वनामे आहेत ?

(1) पुरुषवाचक सर्वनाम
(2) संबंधी सर्वनाम
(3) दर्शक सर्वनाम
(4) प्रश्नार्थक सर्वनाम

35. हा-असा, असला, इतका ही कोणती विशेषणे आहेत ?

(1) संख्यावाचक (2) क्रमवाचक (3) सर्वनामसाधित (4) गणना वाचक

36. कथेकरी म्हणजे ____________

(1) कथा सांगणारा (2) कथा लिहिणारा (3) गोष्टीवाला (4) कथावाला

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

37. ज्या नामांनी एकाच धर्मीचा म्हणजेच एका प्राण्याचा, पदार्थाचा, किंवा त्यांच्या समूहाचा बोध होतो त्यांना म्हणतात
(1) सर्वनामे (2) सामान्य नामे (3) विशेष नामे (4) भाववाचक नामे

38. नामाचा प्रकार ओळखा.
'समुद्र'
(1) विशेषनाम (2) सामान्यनाम (3) भाववाचकनाम (4) समुदायवाचकनाम

39. पुढीलपैकी 'ला' आख्यात ओळखा.
(1) बसला (2) बसू (3) बसतो (4) बसावा

40. खालील वाक्यातील काळ ओळखा.
मी बालपणी लवकर उठत असे.
(1) रीति भूतकाळ (2) अपूर्ण भूतकाळ
(3) पूर्ण भूतकाळ (4) पूर्ण वर्तमानकाळ

41. ज्या सामासिक शब्दात पहिले पद महत्त्वाचे असते, त्या समासास म्हणतात
(1) तत्पुरुष समास (2) अव्ययीभाव समास
(3) बहुव्रीही समास (4) कर्मधारय समास

42. खालील मराठी शब्दासाठी इंग्रजी भाषेतील पर्यायी शब्द कोणता ?
मूळ वेतन
(1) Total pay (2) Basic pay (3) Special pay (4) Extra payment

43. विसर्गसंधी ओळखा.
मनः + राज्य
(1) मनराज्य (2) मन:राज्य (3) मनोराज्य (4) मनाचेराज्य

44. खालीलपैकी कोणता शब्द 'पुराणमतवादी' या शब्दाशी सुसंगत आहे ?
(1) पुराणे वाचणारा (2) पुराणे सांगणारा
(3) पुरोगामी (4) कर्मठ-(प्रतिगामी)

45. मूर्धन्य वर्णाचा गट ओळखा.
(1) त्, थ्, द्, ध्, न् (2) ट्, ठ्, ड्, ढ्, ण्
(3) प्, फ्, ब्, भ्, म् (4) च्, छ्, ज्, झ्, ञ्

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

46. खालील शब्दसमूहातील विसंगतशब्द कोणता ?
(1) हुतुतू (2) खो-खो (3) आट्या-पाट्या (4) मैदान

---

47. खालील दोन केवल वाक्यांचे वाक्य संश्लेषण करा.
मी आळस करते. माझ्या आईला ते आवडत नाही.
(1) मी आळस करते म्हणून आईला आवडत नाही.
(2) माझी आळशीवृत्ती आईला मुळीच आवडत नाही.
(3) माझ्या आईला माझा आळशीपणा आवडत नाही.
(4) माझे आळस करणे माझ्या आईला आवडत नाही.

---

48. 'स, ला, ते .... ' ही प्रत्यये कोणत्या विभक्तीची आहेत ?
(1) द्वितीया-चतुर्थी (2) तृतीया-चतुर्थी
(3) पंचमी-षष्ठी (4) षष्ठी-सप्तमी

---

49. शब्दजाती बदलून वाक्य लिहा.
श्रीमंत-माणसांना गर्व असतो. (विशेषणाचे नाम करून लिहा.)
(1) श्रीमंत माणसे गर्विष्ठ असतात. (2) श्रीमंतांना गर्व असतो.
(3) श्रीमंत नेहमी गर्व करतात. (4) श्रीमंत माणसे गर्वाने पछाडतात.

---

50. पुढीलपैकी 'प्रत्ययघटित' शब्द कोणता ?
(1) टाकाऊ (2) उपवास (3) घरोघरी (4) पंचवटी

---

51. लेखनामध्ये अर्धविरामासाठी कोणते चिन्ह वापरतात ?
(1) (:) (2) (-) (3) (?) (4) (;)

---

52. मिश्र वाक्य करा :
मला ताप आला आहे, मी शाळेत जाणार नाही.
(1) ताप असल्यावर शालेत जाणे बंदच की.
(2) ताप आला मी शाळेत जाणार नाही.
(3) मी शाळेत जाणार नाही कारण मला ताप आला आहे.
(4) शाळेत जाणे बंद ताप आहे मला.

---

53. 'नवरात्र' या सामासिक शब्दाचा विग्रह कसा होईल ?
(1) नौ रात्रींचा समूह (2) नव रात्रींचा समूह
(3) नऊ रात्रींचा समूह (4) नवरात्रौत्सव

---

**54.** जे खरे असेल ते तू बोलावेस. वाक्य प्रकार ओळखा.

(1) संयुक्त वाक्य (2) केवल वाक्य

(3) मिश्र वाक्य (4) साधे वाक्य

---

**55.** 'काळ्या दगडावरची रेघ' म्हणजे ____________

(1) प्राचीनकाळचे दगडावरील शब्द. (2) खोटे न ठरणारे शब्द.

(3) पुसून टाकता न येणारे शब्द. (4) खूप काळापर्यंत टिकणारे शब्द.

---

**56.** शेजाऱ्यांशी चांगल्या तऱ्हेने वागण्याची पद्धत म्हणजे ____________

(1) पाजारधर्म (2) शेजारधर्म (3) नातेधर्म (4) गोतेधर्म

---

**57.** प्रयोगाचे रूपांतर करा.

मी चहा घेतला. (कर्मणी करा.)

(1) मी चहा घेणार होतो. (2) माझ्याकडून चहा घेतला गेला.

(3) चहा घेणे बरे असते. (4) कुणाकडूनही चहा घ्यावा.

---

**58.** उंबराचे फूल म्हणजे __________

(1) दुर्मिळ वस्तू (2) विघ्न (3) दुःख (4) आनंद

---

**59.** ही काही वाईट कल्पना नाही. या वाक्याचे होकारार्थी वाक्य ओळखा.

(1) कल्पनेला बरे म्हटले पाहिजे. (2) कल्पना सदैव बरी असते.

(3) कल्पना ही वाईट नाही. (4) ही कल्पना बऱ्यापैकी आहे.

---

**60.** 'AGREEMENT' या इंग्रजी शब्दास पर्यायी मराठी शब्द कोणता ?

(1) बंधन (2) करार (3) पारपत्र (4) परवानापत्र

---

**61.** 'तू फारच चतुर आहेस.' या वाक्याचे योग्य उद्‌गारार्थी वाक्य कोणते ?

(1) तू ! फार चतुर आहेस (2) किती चतुर आहेस तू !

(3) छान चतुर ! आहेस तू (4) फार चतुर आहेस ! तू

---

**62.** खालील वाक्यखंडासाठी पुढीलपैकी कोणता शब्द योग्य पर्याय ठरेल ?

जिंकण्याची दुर्दम्य इच्छा असलेला.

(1) विजयंता (2) विजिगिशा (3) विजिगीषू (4) सदाविजेता

---

63. संयुक्त वाक्याचे पृथक्करण करा :
'मला राजाश्रय मिळाला होता; पण राजकृपा मात्र माझ्या वाट्याला आली नव्हती.'
(1) आली नव्हती-उद्देश, माझ्या वाट्याला – विधेयपूरक, पण राजकृपा मात्र-कर्म विस्तार, मिळाला होता-विधेय विस्तार, मला राजाश्रय-कर्म
(2) पण राजाश्रय मात्र – उद्देश, मला राजाश्रय मिळाला होता – कर्मपूरक, माझ्या वाट्याला-उद्देश विस्तार, आली नव्हती – विधेय
(3) पण-उभयान्वयीअव्यय, राजाश्रय, राजकृपा-उद्देश, मला-कर्म, मिळाला होता, आली नव्हती-विधेय, माझ्या वाट्याला-विधेय विस्तार
(4) मला राजाश्रय-उद्देश, मिळाला होता-कर्मपूरक, पण राजकृपा मात्र- विधेय पूरक, माझ्या वाट्याला-कर्म विस्तार, आली नव्हती – विधेय विस्तार

64. 'मी कादंबरी लिहीन.' या वाक्यातील 'काळ' ओळखा.
(1) भूतकाळ (2) वर्तमानकाळ (3) भविष्यकाळ (4) साधा वर्तमानकाळ

65. केवल वाक्याचे पृथक्करण करा.
शरदाच्या चांदण्यात गुलमोहर मोहक दिसतो.
(1) शरदाच्या चांदण्यात – विधेय विस्तार, गुलमोहर-उद्देश, मोहक-विधानपूरक, दिसतो-क्रियापद
(2) शरदाच्या चांदण्यात-उद्देश विस्तार, गुलमोहर-विधानपूरक, मोहक-उद्देश, दिसतो- कर्म विस्तार
(3) शरदाच्या चांदण्यात – कर्म विस्तार, गुलमोहर- क्रियापद मोहक-विधानपूरक, दिसतो-क्रियापद
(4) शरदाच्या चांदण्यात-उद्देश, गुलमोहर-विधानपूरक, मोहक-क्रियापद, दिसतो-विधेय

66. 'झटून अभ्यास केला की यश हमखास मिळते.' या वाक्याचा प्रकार सांगा.
(1) केवल वाक्य (2) संयुक्त वाक्य (3) मिश्र वाक्य (4) विधानार्थी वाक्य

67. खालील शब्दरूपे मराठी व्याकरणात कोणत्या प्रकाराची आहेत ?
बोलताना, लिहिताना
(1) नाम (2) कृदन्त (3) विशेषण (4) वचन

68. 'आरती सुरु झाल्यावर घंटानाद सुरु झाला.' या वाक्याचा प्रकार ओळखा.
(1) संयुक्त वाक्य (2) मिश्र वाक्य
(3) विधानार्थी वाक्य (4) केवल वाक्य

69. पुढील समास कोणत्या प्रकारचा आहे ?
पुरणपोळी
(1) मध्यमपदलोपी समास (2) तत्पुरुष समास
(3) अव्ययीभाव समास (4) द्वंद्व समास

70. 'वेदांत' शब्दास योग्य प्रकारे जुळणारा पर्याय शोधा.
(1) वैदांत (2) वेन्दान्त (3) वेन्दान्त (4) वेदान्त

71. 'तो फार हळू बोलतो.' या वाक्यातील क्रियाविशेषण अव्यय ओळखा.
(1) हळू (2) फार (3) तो (4) बोलतो

72. 'तानाजी लढत होता आणि तो पडला.' हे वाक्य कोणत्या प्रकारचे आहे ?
(1) संयुक्त (2) मिश्र (3) केवल (4) साधे

73. 'पुस्तक' हा शब्द मराठी व्याकरणात कोणत्या लिंगप्रकारात येतो ?
(1) नपुसकलिंग (2) पुल्लिंग (3) स्त्रीलिंग (4) यापैकी कोणत्याच नाही

74. वाक्याचा प्रकार सांगा.
आजकाल हजार रुपये म्हणजे मोठी रक्कम नव्हे.
(1) होकारार्थी (2) नकारार्थी (3) प्रश्नार्थक (4) विधानार्थी

75. 'दोन्हीकडून सारख्याच अडचणीत सापडणे.' या अर्थाची म्हण ________
(1) इकडे आड तिकडे विहीर. (2) इकडे वारा तिकडे झरा.
(3) इकडे नदी तिकडे समुद्र. (4) दुष्काळात तेरावा महिना.

76. पुढीलपैकी शुद्ध शब्द ओळखा.
(1) नागपूर (2) तारापुर (3) संबळपुर (4) पालमपुर

77. 'आसपास' हे कोणत्या प्रकारचे क्रियाविशेषण आहे ?
(1) संख्यावाचक (2) कालवाचक (3) परिणामवाचक (4) स्थलवाचक

78. वाक्यात आश्चर्य, आनंद, खेद अशा मनोधर्मांचा उल्लेख येतो, तेव्हा वाक्याच्या शेवटी कोणते चिन्ह वापरतात ?
(1) उद्गारवाचक (2) प्रश्नचिन्ह (3) स्वल्पविराम (4) पूर्णविराम

79. '<u>दाम</u> करी काम.' आधोरेखित शब्दाचा पर्याय निवडा.
(1) दमा (2) पैसा (3) दागिने (4) कपडे

80. पुढील वाक्यातील आघातरहित जोडाक्षर ओळखा.
चिं. वि. जोशी यांचे 'चिमणरावांचे चऱ्हाट' हे विनोदी पुस्तक आहे.
(1) विनोदी पुस्तक (2) चऱ्हाट (3) चिमणरावांचे (4) विनोद

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

81. <u>अतिशय</u> <u>सुंदर</u>, <u>देखणी</u> वास्तू असे ताजमहलाचे वर्णन करता यईल. – या वाक्यातील अधोरेखित शब्दांसाठी एक शब्द निवडा.
(1) अप्रतिम (2) चांगली (3) साधी (4) प्राचीन

82. 'दारु पिणे वाईट आहे' वाक्यप्रकार ओळखा.
(1) केवल वाक्य (2) संयुक्त वाक्य (3) मिश्र वाक्य (4) मिश्र-संयुक्त

83. 'रक्षणाची काळजी वाहणे' या अर्थाचा वाक्प्रचार ओळखा.
(1) हातमिळवणी करणे (2) योगक्षेम चालवणे
(3) कलम होणे (4) पाळण्यात जोजावणे

84. 'पोपट' या नामाचे स्त्रीलिंगी रूप कोणते होईल ?
(1) पोपटीण (2) मैना (3) पोपटिणी (4) पोपट

85. खालील शब्दाला पर्याय सांगा.
'खग'
(1) आकाशात फिरणारे (2) पक्षी
(3) जलचर (4) उडता न येणारे

86. विरुद्धार्थी शब्द लिहा.
'आपला'
(1) स्वत:चा (2) आमचा (3) सर्वांचा (4) परका

87. 'अनासक्ती' या शब्दाच्या विरुद्धार्थी शब्द कोणता ?
(1) नासक्ती (2) आसक्ती (3) सक्ती (4) सक्तीविना

88. 'हरि-हर' या शब्दांतील दोन पदांमध्ये वापरलेले चिन्ह कोणते ?
(1) प्रश्नचिन्ह (2) उद्‌गारवाचकचिन्ह
(3) संयोगचिन्ह (4) अवतरणचिन्ह

89. खालील शब्दांपैकी अशुद्ध शब्द कोणता ?
कीर्ती, नवीन, दूध, तिक्ष्ण
(1) नवीन (2) दूध (3) कीर्ती (4) तिक्ष्ण

90. 'व्यंगार्थ' सूचित करणाऱ्या शब्दशक्तीला म्हणतात
(1) अभिधा (2) लक्षणा (3) व्यंजना (4) यापैकी नाही

91. 'Environment' या इंग्रजी शब्दास खालीलपैकी कोणता मराठी शब्द पर्यायी ठरेल ?
(1) गुंतवणूक (2) पर्यावरण (3) वातावरण (4) अंतर्भाव

92. प्रकृती <u>तोळामासा</u> असल्याने मला आईला फार जपावे लागते. या वाक्यातील 'तोळामासा' या शब्दाचा अर्थ काय ?
(1) अतिशय नाजुक (2) मासे खाण्यात पटाईत
(3) पुन्हा पुन्हा तुलना करणारी (4) वरीलपैकी कोणताही नाही

93. 'तटिनी' कुणाला म्हणतात ?
(1) ताटातूटीला (2) नदीला
(3) अटितटी करणाऱ्याला (4) तरटांनी बांधलेल्या झोपडीला

94. पुढील वाक्यातील योग्य वाक्य शोधा.
(1) प्रचंड मराठी पुस्तकांचे प्रदर्शन सुरु. (2) मराठी पुस्तकांचे प्रचंड प्रदर्शन सुरु.
(3) मराठी पुस्तकांचे प्रदर्शन प्रचंड सुरु. (4) मराठी पुस्तकांचे सुरु प्रचंड प्रदर्शन.

95. 'जिच्या गळ्यात गंधार आहे असं दिनानाथ म्हणायचे, ती ही स्वरसम्राज्ञी लता'. हे वाक्य कोणत्या प्रकारचे आहे ?
(1) मिश्र वाक्य (2) संयुक्त वाक्य
(3) केवल वाक्य (4) यापैकी कोणतेही नाही

96. खाली दिलेल्या शब्दसमूहासाठी योग्य शब्द शोधा.
'लिहिता वाचता येणारा.'
(1) साक्षर (2) निरक्षर (3) अवाक्षर (4) असाक्षर

97. 'गुलाब' 'बारदान' 'गालीचा' 'अब्रु' हे शब्द कोणत्या भाषेतील आहेत ?
(1) कन्नड (2) अरबी (3) फारसी (4) यापैकी नाही

98. खालील शब्दसमूहासाठी सार्थ ठरेल असा एक शब्द कोणता ?
'<u>देशासाठी वा समाजासाठी ज्याने प्राण वेचले तो</u>.'
(1) हुतात्मा (2) महापुरुष (3) धर्मात्मा (4) लोहपुरुष

99. 'मिश्यांना तूप लावणे' या वाक्प्रचाराचा योग्य पर्याय शोधा.
(1) उगीच ऐट करणे. (2) शक्तीमान नसणे.
(3) सशक्त असणे. (4) फजिती होणे.

100. 'चीनच्या आक्रमणामुळे भारतीयांच्या अंगाचा तिळपापड होतो ' या वाक्यातील ध्वन्यर्थ ओळखा.
(1) दु:ख होणे. (2) रागाने बेफाम होणे.
(3) पापड खाणे. (4) निराश होणे.

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

101. 'अंबर' या शब्दाचा समानार्थी शब्द ओळखा.
(1) परमेश्वर (2) आकाश (3) अभंग (4) अमर

102. समानार्थी शब्द सांगा : 'हिरमोड'.
(1) पदरमोड (2) विरस (3) अपयश (4) वाईट वळण

103. 'चार दिवस सासूचे चार दिवस सुनेचे' या म्हणीचा अर्थ काय ?
(1) प्रत्येकाला काही दिवस अधिकार मिळतात.
(2) सासू आणि सून यांचे अजिबात पटत नाही.
(3) सासू-सुनेने आपापल्या कामाची वाटणी करून घेणे.
(4) सासू व सून या दोघींचेही चुकतेच.

104. पुढीलपैकी कोणता शब्द 'प्रसिद्ध' या शब्दाचा पर्याय नाही ?
(1) प्रख्यात (2) विख्यात (3) आख्यात (4) सर्वज्ञात

105. 'त्याने निबंध लिहिला' या वाक्याचे साधे वर्तमान काळी रूप लिहा.
(1) तो निबंध लिहीन. (2) तो निबंध लिहित असेन.
(3) तो निबंध लिहितो. (4) तो निबंध लिहित जाईन.

106. खालीलपैकी कोणता शब्द 'किंमत' या अर्थाचा नाही ?
(1) मूल्य (2) दर्जा (3) भाव (4) दर

107. रिकाम्या जागी योग्य शब्द निवडा.
'पुरामुळे लोकांचे ______________ नुकसान झाले.'
(1) आवर्जून (2) अपरिमित (3) अफाट (4) असंख्य

108. 'मांजर उंदीर पकडते' या वाक्यातील प्रयोग ओळखा.
(1) कर्तरी (2) कर्मणी (3) भावे (4) संकर

109. 'परवड' या शब्दाचा योग्यप्रकारे वापर खालीलपैकी कोणत्या वाक्यात केला आहे ?
(1) महागाईमुळे त्याला वस्तू घेणे परवडत नाही.
(2) पगार नसल्याने खाण्या-पिण्याची त्याची परवड होत आहे.
(3) परवडल्यावरच त्याने बैल विकला.
(4) पर-वडाचा आपल्याला काय उपयोग ?

110. पुढीलपैकी 'तत्सम' नसलेला शब्द ओळखा.

(1) धर्म (2) भाऊ (3) कन्या (4) वृक्ष

खालील उतारा वाचून त्यावरील प्रश्नक्रमांक **111** ते **115** ची उत्तरे द्या.

पाठांतराची लाज बाळगणे हे रानटीपणाचे लक्षण आहे. मानवी प्राण्याने ज्या शक्तींचा विकास जाणूनबुजून केलेला आहे, त्या शक्ती वाढत ठेवणे आणि त्यांचा वापर करणे प्रगतीचे लक्षण आहे. जो पुष्कळ पाठ करतो, त्याच्यापुढे नानाप्रकाराची ज्ञाने नेहमी हात जोडून उभी असतात आणि त्याने खूण करताच त्याच्या सेवेला सादर होतात.

जे पाठ करीत नाहीत त्यांना बारीकसारीक कामासाठी सुद्धा कोश पहावे लागतात. संदर्भस्थळे हुडकावी लागतात. किंवा कोणाला तरी जाऊन विचारावे लागते. हा सर्व कालाचा अपव्यय होय. आणि हे जर केले नाही तर अनिश्चित ज्ञानावर विसंबून बसून त्याला आपली विधाने करावी लागतात. म्हणून लहानपणाच्या काळात वस्तू स्मृतीने बद्ध करण्याची सवय वाढविली पाहिजे. कमावणे हा शब्द केवळ कातड्यालाच लागू नाही. तो मानवाच्या शक्तींनाही लागू आहे. स्मृती एकदा कमावली म्हणजे ती सर्वसमावेशक आणि चिवट बनते. तिच्या कोशात पुष्कळ वस्तू मावतात आणि त्याचा कब्जा ती सहसा सोडीत नाही. हे भांडवल माणसाला मरेपर्यंत पुरते. म्हणून नमुनेदार विद्यार्थी बनू इच्छिणाऱ्याने पाठांतराचा सपाटा कायम ठेवला पाहिजे.

111. रानटीपणाचे लक्षण कोणते ?

(1) भाषांतराची लाज बाळगणे (2) रूपांतराची लाज बाळगणे

(3) अनुवादाची लाज बाळगणे (4) पाठांतराची लाज बाळगणे

112. पाठांतराचा फायदा कोणता ?

(1) वेळेचा अपव्यय होत नाही. (2) काळाचा अपव्यय होत नाही.

(3) स्थळाचा अपव्यय होत नाही. (4) स्थळकाळाचा अपव्यय होत नाही.

113. जे पाठांतर करीत नाही त्यांना ______________ पहावे लागतात.

(1) संदर्भग्रंथ (2) कोश (3) नकाशे (4) आराखडे

114. कमावणे या शब्दातून काय अभिप्रेत आहे ?

(1) कुपैसा कमावणे (2) कातडी कमावणे

(3) भांडवल कमावणे (4) स्मृती कमावणे

115. उताऱ्याचा मुख्य विषय कोणता आहे ?

(1) पाठांतराचे फायदे (2) संदर्भस्थळे

(3) लहानपण आणि स्मृती (4) वेळेचा सदुपयोग

खालील उतारा वाचून त्याखालील प्रश्न क्र. 116 ते 120 प्रश्नांची उत्तरे लिहा.

साहित्याचे क्षेत्र हे स्वयंशासित असले पाहिजे असे मी मानतो. लेखकावर कोणत्याही संस्थेने वा शासनाने नेहमीच्या परिस्थितीत बाह्य बंधने घालणे अयोग्य व अनिष्ट आहे असे मला वाटते. त्याने कोणता विषय निवडावा, त्याची रचना कशी करावी हे ठरवण्याचे त्याला पूर्ण स्वातंत्र्य असले पाहिजे. त्याने आपली प्रतिभा तत्त्वनिरूपण, नीतिबोध, मतप्रचार यांसाठी राबवावी अशी अपेक्षा करणे बरोबर नाही. मग साहित्याची बांधिलकी म्हणजे तरी काय असा प्रश्न शिल्लक राहतो. लेखकाची बांधिलकी स्वत:शीच असली पाहिजे. त्याने स्वत:च्या जीवननिष्ठेशी, अनुभवाशी व वाङ्मयीन माध्यमाशी इमान राखले म्हणजे झाले. कोणत्याही ठराविक पद्धतीने सामाजिक जबाबदारी पार पाडण्याची त्याच्यावर सक्ती करणे श्रेयस्कर नाही. व्यक्ती व समाज यांच्यातील संबंध आणि सांस्कृतिक जीवनातील साहित्याचे स्थान यासंबंधीचा त्याचा दृष्टिकोन निकोप, सुस्पष्ट व मूलग्राही असेल, तर त्याच्या वाङ्मयात समाजपराङ्मुखतेचा लवलेशही आढळणार नाही. उलट त्याची अस्मिता संपूर्ण सामाजिक जीवनाला सामावून घेण्याइतकी विशुद्ध व व्यापक बनलेली असेल.

116. लेखकावर कोणती सक्ती करू नये ?
(1) सांस्कृतिक जबाबदारी पार पाडण्याची.
(2) ठराविक पद्धतीनेच सामाजिक जबाबदारी पार पाडण्याची.
(3) शुद्ध व सुटसुटीत लिखाण करण्याची.
(4) नीतिबोधाचा प्रचार करण्याची.

117. लेखकाने आपले इमान कशाशी राखावे ?
(1) मिळणाऱ्या मानधनाशी.
(2) लोकांच्या आवडी-निवडीशी.
(3) स्वत:ची जीवननिष्ठा, अनुभव व वाङ्मयीन माध्यमाशी.
(4) लोकांच्या मतप्रचाराशी.

118. लेखकास कशाचे स्वातंत्र्य असावे ?
(1) सामाजिक जबाबदारी पार पाडण्याचे.
(2) तत्त्वनिरूपणाचे.
(3) नीतिबोध शिकविण्याचे.
(4) विषयनिवडीचे व रचनेचे.

119. 'समाजपराङ्मुखता' म्हणजे काय ?
(1) समाजाशी अतिनिकट संबंध.
(2) समाजावर तोंडसुख घेणे.
(3) समाजापासून दूर राहणे.
(4) समाजजीवनाला सामावून घेणे.

120. 'लवलेश नसणे' या वाक्प्रचाराचा अर्थ काय ?
(1) काहीच नसणे.
(2) शरीरावर केस नसणे.
(3) कमतरता नसणे.
(4) मोजकेच असणे.

पुढील उतारा वाचून खालील 121-125 प्रश्नांची उत्तरे द्या :

राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या विवेकानंदांच्या योजनेत 'व्यक्तिमत्त्वाचा विकास' ही मध्यवर्ती कल्पना होती. त्यांच्या स्वत:च्या प्रांतामध्ये, बंगालमध्ये तरुणांना उद्देशून ते म्हणाले :

'पैसे असणाऱ्या श्रीमंत आणि प्रतिष्ठित माणसाकडे आदराने पाहू नका. जगातली सर्व महान आणि प्रचंड कामे गरिबांनीच केली आहेत .... 'तुम्ही गरीब आहात म्हणूनच तुम्ही काम कराल. तुमच्याकडे काहीच नाही म्हणून तुम्हीच प्रामाणिक राहाल''.

'माझ्या मुलांनो गरीब, अज्ञानी आणि पददलितांबद्दल तुम्हाला काहीतरी वाटू द्या. हृदयाचे ठोके थांबून जाईपर्यंत, मेंदू चक्रावून जाईपर्यंत आणि आपण आता वेडे होऊ असे तुम्हाला वाटेपर्यंत तुम्हाला गरिबांबद्दल सद्भावना वाटू द्या ..... संघर्ष करा, संघर्ष करा हेच गेली दहा वर्षं माझे बोधवाक्य होते, आणि आजही मी म्हणतो संघर्ष करा. जेव्हा सगळीकडे अंधार होता तेव्हा मी म्हणत असे संघर्ष करा. आता प्रकाशाची प्रभा फाकू लागली तरीही मी म्हणतो संघर्ष करा. माझ्या बाळांनो, कसलीही भीती बाळगू नका....

'वृद्धीसाठी पहिली आवश्यक गोष्ट म्हणजे स्वातंत्र्य. ज्याप्रमाणे विचार करण्याचे, बोलण्याचे स्वातंत्र्य माणसाला लागते त्याप्रमाणे अन्न, वस्त्र, निवारा आणि इतर प्रत्येक बाबतीत माणसाला स्वातंत्र्य असायला हवे .....'

121. वरील उताऱ्याचा वर्ण्यविषय कोणता ?
(1) व्यक्तिविकासाला अवरोध
(2) गरीबांचा उद्धार
(3) व्यक्तिमत्त्वाचा विकास
(4) श्रीमंतांची भूमिका

122. जगातील महान आणि प्रचंड कामे आजपर्यंत कोणी केली आहेत ?
(1) गरीबांना काम उपलब्ध होते.
(2) गरीबच काम करतो.
(3) जगातली आजवरची महान कामे गरीबांनीच केली आहेत.
(4) गरीबांना काम करायला आवडते.

123. वरील उताऱ्यात विवेकानंदांनी युवकांना कोणते आवाहन केले आहे ?
(1) संघर्षापासून दूर राहा.
(2) सतत संघर्ष करा.
(3) संघर्षापासून सावध असा.
(4) संघर्षाला घाबरून राहा.

124. व्यक्तिला स्व-वृद्धीसाठी कोणकोणते स्वातंत्र्य असायला हवे ?
(1) विचाराचे, बोलण्याचे तसेच अन्न, वस्त्र व निवाऱ्याचे
(2) केवळ उच्चाराचे
(3) अन्न व निवाऱ्याचे
(4) केवळ विचार; अन्न-वस्त्राचे

125. कोणत्या थराला जाईपर्यंत गरीबांविषयी सहानुभाव वाटायला हवा ?
(1) केवळ हृदयाचे ठोके थांबेपर्यंत.
(2) केवळ मेंदू चक्रावून जाईपर्यंत.
(3) हृदयाचे ठोके थांबून मेंदू चक्रावून आपण आता वेडे होऊ असे वाटेपर्यंत.
(4) आपण आता वेडे होऊ असे वाटेपर्यंत.

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

खालील उतारा वाचून त्यापुढील 126 ते 130 प्रश्नांची उत्तरे द्या.

आपण आपले जीवन अनेक वेळा रुपये-आणि-पैसे यांच्या हिशोबात बसविण्याचा प्रयत्न करतो. प्रतिष्ठेची आपणाभोवती खरीखोटी वलये निर्माण करतो आणि त्यामुळे निर्माण होणाऱ्या चाकोरीला जीवन असे नाव देऊन त्या जीवनातच आनंद मानण्याचा आपण प्रयत्न करतो.

जीवनात किती वेळा आपण मनसोक्त पावसात भिजायचेच या कल्पनेने पावसात छत्री न घेता बाहेर पडलो आहोत ? आनंदी आनंद गडे ! जिकडे तिकडे चोहिकडे ! असा बालकवी आपणास संदेश देतात पण निसर्गातील हा आनंद लुटण्यासाठी आपणापैकी किती जण बाहेर पडतात ? संध्याकाळी घाईघाईने निघालेल्या एखाद्या गृहस्थास 'कुठे जातोस' ? असे आपण विचारले आणि 'सूर्यास्त पाहावयास मी जातो आहे' असे त्याने उत्तर दिले तर आपण निश्चित 'आ' करून त्याच्याकडे पाहात राहू. अरुण, संध्यारजनी, कौमुदी वगैरे सृष्टिदेवीची बालके शेवटी बालकवींच्या कवितेत राहातात आणि आम्ही चांदण्या रात्री विजेच्या दिव्याच्या कृत्रिम प्रकाशात 'रमी' खेळण्यात रमून गेलेलो असतो. 'फुलराणी' शिकवितांना मी साऱ्या विद्यार्थ्यांना गुंगवून सोडल्याचे मला आठवते. पण वेलीवरच्या कोमल कलिकेचे सौंदर्य पाहण्याला मी कधी थांबलो असल्याचे मला आठवत नाही. निर्झराच्या गोड गीतात बालकवींना दिसलेला अर्थ मी विद्यार्थ्यांना कितीदा समजावून सांगितला असेल पण निर्झराच्या काठाशी त्याची अवखळ गीते ऐकत मी उभा राहिल्याचे मला आठवत नाही.

126. माणसे आपल्या जीवनात कोणती वलये निर्माण करतात ?

(1) पैशांची (2) सुखीसमृद्ध जीवनाची

(3) ज्ञानप्रतिष्ठेची (4) प्रतिष्ठेची खरीखोटी

127. बालकवींनी कोणता संदेश दिलेला आहे ?

(1) हासू खेळू नाचू (2) आनंदीआनंदाचा

(3) दुःखीकष्टी राहण्याचा (4) शांत राहण्याचा

128. एखाद्याने कोणते उत्तर दिले तर आपणास आश्चर्य वाटेल असे लेखक म्हणतो ?

(1) बागेत फिरण्यास जातो. (2) सूर्यास्त पाहण्यास जातो.

(3) क्रिकेट खेळण्यास जातो. (4) सिनेमा पाहण्यास जातो .

129. आजच्या काळात माणसे कशात रमत आहेत ?

(1) विटी-दांडू खेळण्यात (2) पोहण्यात

(3) चांदण्यांत फिरण्यात (4) पत्त्यांच्या खेळात

130. वरील उताऱ्यातून व्यक्त होणारा मथितार्थ कोणता आहे ?

(1) माणूस व निसर्ग हे दोघे वेगळे आहेत. (2) माणसाला निसर्गाची गरज नाही.

(3) माणूस निसर्गाला दुरावला आहे. (4) माणूस निसर्गावर अवलंबून आहे.

